**विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन प्रशासकीय इमारतीमधील साफ सफाईच्या कामासाठी मंजूर असलेल्या २३ अस्थायी पदांना दिनांक ०१/०३/२०१५ ते दिनांक २९/०२/२०१६ पर्यंत मुदतवाढ देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**

शासन निर्णय क्रमांकः ईएसटी-२०१५/प्र.क्र.१०४/ई-८
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (मुख्य इमारत), मुंबई- ४०० ०३२.
तारीख: ०३ जुलै, २०१५.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. संकीर्ण-१००२/प्र. क्र. ६६(भाग-२)/ई-८,दि. २० मार्च, २००६.

२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. इएसटी-२११४/प्र.क्र.५९/ई-८, दि. १३/०५/२०१४.

३) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई यांची पत्रे क्र. साशा/कक्ष-१/इमारत/मुदतवाढ/ २०१५-२०१६, दि. १०/०२/२०१५ व २८/०५/२०१५.

**शासन निर्णय:-**

शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. संकीर्ण-१००२/प्र.क्र. ६६(भाग-२)/ई-८, दिनांक २० मार्च, २००६ अन्वये क्षेत्रिय कार्यालयातील पदांचा आकृतीबंध निश्चित करण्यात आला आहे. उपरोक्त दिनांक २० मार्च, २००६ च्या आकृतीबंधात समाविष्ट नसलेल्या कोकण विभागातील कोकण भवन येथील प्रशासकीय इमारतीच्या साफसफाईच्या कामासाठी मंजूर असलेल्या एकूण २५ पदांना अनुक्रमांक २ येथील दिनांक १३/०५/२०१४ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१/०३/२०१४ ते दिनांक २८/०२/२०१५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. सदर एकूण २५ पदांपैकी १ उदवाहक दिनांक ३०/०६/२०१४ रोजी व १ उदवाहक दिनांक २८/०२/२०१५ रोजी सेवानिवृत्त झाले असल्यामुळे आता एकूण २३ पदांना मुदतवाढ देणे आवश्यक आहे.

२. या शासन निर्णयाद्वारे आकृतीबंधात समाविष्ट नसलेल्या कोकण विभागातील कोकण भवन येथील प्रशासकीय इमारतीच्या साफसफाईच्या कामासाठी कार्यरत असलेल्या सोबतच्या विवरणपत्रात दर्शविल्यानुसार २३ अस्थायी पदांपैकी १ हमाल दिनांक ३०/०४/२०१५ रोजी सेवानिवृत्त झाले असल्यामुळे सदर पदास दिनांक ०१/०३/२०१५ ते ३०/०४/२०१५ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. दुसरे १ हमाल दिनांक ३१/०५/२०१५ रोजी सेवानिवृत्त झाले असल्यामुळे सदर पदास दिनांक

०१/०३/२०१५ ते ३१/०५/२०१५ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे व तिसरे १ हमाल दिनांक ३१/०७/२०१५ रोजी सेवानिवृत्त होणार असल्यामुळे सदर पदास दिनांक ०१/०३/२०१५ ते ३१/०७/२०१५ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. तसेच उर्वरित २० पदांना दिनांक ०१/०३/२०१५ ते २९/०२/२०१६ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. उपरोक्त पदांपैकी एकही पद सहा महिन्यापेक्षा अधिक कालावधीकरीता रिक्त नव्हते तसेच एकही पद कमी करण्यात आलेले नाही. या अटीच्या अधिन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे.

४. यासाठी होणारा खर्च, "मागणी क्र.सी-१, २०५३- जिल्हा प्रशासन, १०१ आयुक्त, (०१) सर्व साधारण आस्थापना, (०१)(०१) आयुक्त कोकण (२०५३ ०३८७)" या लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा

५. सदरहू आदेश वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २५९/२०१५/व्यय-९, दिनांक १५/०६/२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे

सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७०३१६१८४७८३१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sambhaji Chandrakant Mondkar

Digitally signed by Sambhaji Chandrakant Mondkar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sambhaji Chandrakant Mondkar
Date: 2015.07.03 17:22:25 +05'30'

( सं. चं. मोंडकर )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
२. प्रधान महालेखापाल १ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) महाराष्ट्र १, मुंबई.
३. जिल्हा कोषागार अधिकारी, कोकण भवन, नवी मुंबई.
४. वित्त विभाग, कार्यासन व्यय-९/ वित्तीय सुधारणा-१, मंत्रालय, मुंबई-३२.
५. कार्यासन अधिकारी, कार्यासन ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. निवड नस्ती, कार्यासन ई-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

# विवरणपत्र

(शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक: ईएसटी-२०१५/प्र.क्र.१०४/ई-8, दिनांक 03/07/२०१५ च्या सोबत)

| कार्यालयाचे नांव | पदनामे | | एकूण पदे | दि. ०१/०३/२०१५ ते दि. २९/०२/२०१६ या कालावधीत सेवानिवृत्त होणारे कर्मचारी | मुदतवाढीचा अंतिम दिनांक | मागील मुदवाढीचा आदेश क्र. व दिनांक | लेखाशीर्ष |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **1** | **2** | **3** | **4** | **5** | **6** | **7** | **8** |
| विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई. | 1 | पहारेकरी | 1 | ----- | 29/02/2016 | शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. इएसटी-2114/ प्र.क्र.५९/ई-8, दिनांक १३ मे, २०१४. | मागणी क्र. सी-1, 2053-जिल्हा प्रशासन १०१-आयुक्त (०१) सर्व साधारण आस्थापना, (०१)(०१) आयुक्त कोकण (2053 0387) 01-वेतन |
| | 2 | स्वच्छता निरीक्षक | 1 | ----- | 29/02/2016 | | |
| | 3 | हमाल | 16 | हमाल- १ पद | 30/04/2015 | | |
| | | | | हमाल- १ पद | 31/05/2015 | | |
| | | | | हमाल- १ पद | 31/07/2015 | | |
| | 4 | सफाईगार | 3 | ----- | 29/02/2016 | | |
| | 5 | उदवाहक | 2 | ----- | 29/02/2016 | | |
| | | **एकूण** | **23** | हमाल- ३ पदे | | | |

-*-*-*-*-*-*-